लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी) परीक्षा-२०१७
**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांचे नियतवाटप**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः एएससी-१५१८/प्र.क्र.१५७/१४-अ**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दूरध्वनी क्रमांक : २२७९४१७२**
तारीखः २८ नोव्हेंबर, २०१८

**ज्ञापन-:**

लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी), या गट क पदावर नियुक्तीसाठी घेण्यात आलेल्या लघुटंकलेखक परीक्षा २०१७ -चा अंतिम निकाल मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२०५३/२०१४ श्री.संजीव शुक्ला विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर संलग्न याचिका प्रकरणी होणाऱ्या अंतिम निकालाच्या अधीन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या व निवडसूचीत समावेश करण्यात आलेल्या उमेदवारांचे नियतवाटप सोबतच्या विवरणपत्र “अ” व “ब” मध्ये नमूद केल्यानुसार त्यांच्या नांवासमोर दर्शविलेल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागात व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी) या रिक्त पदांवर करण्यात येत आहे.

२. सोबतच्या विवरणपत्र “अ” व “ब” मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांची नेमणूक पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात यावी :-

(१) सदर विवरणपत्रातील सर्व उमेदवारांनी **दिनांक २८ डिसेंबर, २०१८ पर्यंत** संबंधित विभाग/कार्यालयात व्यक्तिशः उपस्थित राहून अस्थायी नियुक्तीचा स्वीकार करणे आवश्यक आहे. प्रस्तुत अस्थायी नियुक्तीसंदर्भात या मुदतीत उमेदवारांकडून काही उत्तर न आल्यास, त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता, या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल.

(२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे केलेल्या अर्जातील कोणत्याही अर्हतेबाबतच्या दाव्याची तपासणी/पडताळणी आयोगाने केलेली नसल्याने, नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाताना, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या जाहिरात क्रमांक : ९/२०१८, व १०/२०१८, दिनांक २५.१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची तसेच शैक्षणिक आणि अन्य अटींची अर्हता दिनांक ०१.०५.२०१८ रोजी धारण केल्यासंदर्भातील खाली नमूद केलेली मूळ प्रमाणपत्रे उमेदवारांनी सोबत घेऊन जावीत. नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित राहताना सदर प्रमाणपत्रांची साक्षांकित प्रत उमेदवाराजवळ असणे अत्यावश्यक आहे :-

१) वय/जन्मदिनांक
२) अधिवास
३) शैक्षणिक पात्रता
४) महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांच्या बाबत महिला आरक्षणासंदर्भात विहित केलेले **दिनांक १ एप्रिल, २०१६ किंवा तद्नंतरच्या दिनांकाचे** प्रमाणपत्र

५) मागासवर्गीय असल्यास जाती/जमातीबद्दल विहित नमुन्यात आणि विहित अधिकाऱ्याने दिलेले मूळ प्रमाणपत्र. तसेच संबंधित विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती यांनी दिलेले जात वैधता प्रमाणपत्र. अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांसाठी उन्नत व प्रगत गटात (क्रिमीलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १ एप्रिल, २०१६ किंवा तद्नंतरच्या दिनांकाचे** प्रमाणपत्र.

६) खेळाडू/शारीरिक अपंगत्व असल्यास, त्याबाबतचे सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेले मूळ प्रमाणपत्र.

७) लघुटंकलेखक पदासाठी विहित केलेली मराठी लघुलेखनाची गती ८० शब्द प्रती मिनिट व मराठी टंकलेखनाची ३० शब्द प्रति मिनिट आणि इंग्रजी लघुलेखनाची गती ८० शब्द प्रती मिनिट व इंग्रजी टंकलेखनाची गती ४० शब्द प्रती मिनिट ही अर्हता धारण केल्याबाबतचे शासकीय परीक्षा मंडळाचे प्रमाणपत्र.

(३) उमेदवारांच्या पात्रता विषयक म्हणजेच शिक्षण, वय, खेळाडू, शारीरिक अपंगत्व, जाती विषयक प्रमाणपत्र इत्यादीबाबतच्या मूळ प्रमाणपत्रांची पडताळणी आयोगाने तसेच या विभागाने केली नसल्यामुळे या सर्व बाबतीत नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी पडताळणी करणे आवश्यक आहे. प्रस्तुत उमेदवारांचे शिक्षण, वय, खेळाडू असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, शारीरिक अपंगत्व असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे इत्यादी सर्व मूळ प्रमाणपत्रेही अधिसूचनेत नमूद केलेल्या अर्हतेनुसार आहेत किंवा कसे? हे नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती करतानाच प्रथम तपासून पहावीत. तसेच, सर्व प्रमाणपत्रे आवश्यकतेनुसार संबंधित प्राधिकाऱ्याकडून तपासून घेण्यात यावीत. आयोगाला केलेल्या अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक व योग्य ती प्रमाणपत्रे उमेदवार नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सादर करु शकला नाही तर, उमेदवाराची नियुक्ती करण्यात येणार नाही व उमेदवाराची शिफारस आपोआप रद्द समजण्यात येईल.

(४) महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या महिला उमेदवारांकडून महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:८२/ २००१/मसेआ-२०००/ प्र.क्र.४१५/ का.२, दिनांक २५.५.२००१ व शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१७/ प्र.क्र.१९१/ १७/ का.२, दि.१५.१२.२०१७ नुसार शासनाने प्रस्तावित केलेले उन्नत व प्रगत गटात (क्रिमिलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १ एप्रिल, २०१६ किंवा तद्नंतरच्या दिनांकाचे** प्रमाणपत्र विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास यांचेकडून तपासून घेण्यात यावे व त्यामधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(५) खेळाडूंसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची शिफारस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ०१.०७.२०१६ आणि त्यास अनुसरुन प्रसिध्द करण्यात आलेल्या शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दिपत्रक क्रमांक : राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८.०८.२०१६ व

तद्‌नंतर शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांमधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(६) अपंगांसाठी राखीव पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या खाली नमूद करण्यात आलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांमधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात यावी :-

(अ) शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२००९/प्र.क्र.९/सुधार-३, दिनांक ३.८.२०१०

(ब) शासन परिपत्रक क्रमांक:अपंग २००९/प्र.क्र.१३३/सुधार-३, दिनांक १४.१.२०११

(क) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांक अप्रकि-६- आरोग्य/२९७.क्र.प्र/२०१२, दिनांक ०६.१०.२०१२

(७) ज्या मागासवर्गीय उमेदवारांची खुल्या प्रवर्गातील पदावर शिफारस करण्यात आली असेल त्या उमेदवारांबाबत सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीबीसी-१०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दिनांक १६.५.२००७ मधील सूचनेनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(८) मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांच्याबाबत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी व जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यास अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीसीसी-२०१२/प्र.क्र.३३२/१२/१६-ब, दिनांक १८.५.२०१३ मध्ये नमूद सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी कार्यवाही करणे अपेक्षित असून, मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात यावी. सदरहू उमेदवाराकडे जात पडताळणी समितीकडून प्राप्त करुन घेतलेले जाती वैधता प्रमाणपत्र असल्यास त्याने नियुक्तीसाठी हजर होताना ते सादर करावे. नसल्यास त्याने जाती प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे/प्रमाणपत्रे नियुक्ती प्राधिकाऱ्यास तात्काळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

नियुक्ती प्राधिकाऱ्याने विनाविलंब सदर कागदपत्रे संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठवावी. याशिवाय संबंधित उमेदवाराने देखील स्वतंत्रपणे जात पडताळणी समितीकडे त्याच्याकडे असलेले कागदपत्रे/पुरावे सादर करुन पाठपुरावा करावा. याप्रमाणे नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. या कालावधीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकल्यास सदर उमेदवाराची पूर्वसूचना न देता सेवा समाप्त करण्याची कार्यवाही नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी. त्यासाठी नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर न केलेल्या उमेदवारांचा वेळोवेळी आढावा घ्यावा व नियुक्ती आदेशापासून ६ महिन्यांच्या आत जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकणाऱ्या उमेदवाराच्या बाबतीत तातडीने सेवा समाप्तीची कार्यवाही करावी. तसेच, शिफारस करण्यात आलेल्या सर्व उमेदवारांचे जाती दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडून व जमातीचे दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून ते संबंधित समितीकडून निर्गमित

करण्यात आल्याची खातरजमा करुन घेण्याची कार्यवाही देखील नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी.

(९) उमेदवारांचे गोपनीय अहवाल न तपासता त्यांचे नियतवाटप केले असल्याने उमेदवार शासकीय कर्मचारी असल्यास त्यांचे गोपनीय अभिलेख नियुक्ती देण्यापूर्वी तपासून त्यानंतरच नियुक्तीबाबत निर्णय घ्यावा.

(१०) लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९.३.२००३ मधील तरतुदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ४.२.२०१३ व शासन समक्रमांकित पूरकपत्र दिनांक ८.१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्यावेळेस सदर प्रमाणपत्र/अर्हता उमेदवारांकडे नसल्यास नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षाच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास उमेदवाराच्या सेवा समाप्त करण्यात येतील ही बाब उमेदवाराच्या नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावी.

(११) लघुटंकलेखक (इंग्रजी) या पदावर नियुक्त होणा-या उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवा (इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांना प्राप्त करावयाच्या मराठी लघुलेखन / मराठी टंकलेखन परिक्षा सक्तीची करण्याबाबत) नियमावली १९९१ मधील नियम ३ व ४ नुसार एतदर्थ मंडळाची मराठी लघुलेखनाची ८० शब्द प्रति मिनिट गतीची व मराठी टंकलेखनाची प्रति मिनिट ३० शब्द प्रति मिनिट गतीची परीक्षा, शासन सेवेत प्रविष्ट झाल्याच्या दिनांकापासून ज्यांनी प्रथम भाषा मराठी (उच्चस्तर) विषय घेऊन माध्यमिक शालांत परिक्षा उत्तीर्ण केली आहे अशा इंग्रजी लघुलेखकांनी चार वर्षाच्या आत व प्रथम भाषा म्हणून मराठी (उच्चस्तर) विषय न घेता माध्यमिक शालांत परिक्षा उत्तीर्ण झालेल्या इंग्रजी लघुलेखकांनी चार वर्षांच्या आत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील, ही बाबही उमेदवारांच्या नियुक्ती आदेशात स्पष्ट करावी. तसेच हिंदी व मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदर परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, ती परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(१२) उमेदवारांना साक्षांकन नमुने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत पाठविण्यात आले आहेत. सदर साक्षांकन नमुना पूर्णपणे भरुन उमेदवाराने त्याचे नियतवाटप करण्यात आलेल्या विभागात हजर होताना तो सादर करावा. हजर झालेल्या उमेदवारांकडून साक्षांकन नमुने प्राप्त करुन घेतल्यानंतर उमेदवारांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : चापअ १००८/प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दिनांक ९.१.२००९ मधील तरतुदी विचारात घेऊन पोलीस विभागाकडून करुन घ्यावी व अहवाल प्रतिकूल

असल्यास, प्रस्तुत शासन निर्णयातील सूचनांनुसार संबंधित उमेदवारांच्याबाबत तातडीने कार्यवाही करुन तसे या विभागास अवगत करावे. **"प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात येणार असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे व सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल."**असा स्पष्ट उल्लेख उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात करण्यात यावा. उमेदवाराच्या चारित्र्य पडताळणी संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक:चापअ १०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दिनांक २६.८.२०१४ मधील सूचनादेखील विचारात घेण्यात याव्यात.

(१३) अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांचे उन्नत व प्रगत गटात (क्रिमिलेयर) मोडत नसल्याचे **दिनांक १.४.२०१६ ते ३१.३.२०१७ या वित्तीय वर्षातील** प्रमाणपत्र सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.१५/मावक-५, दिनांक ३०.६.२००६ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार तपासण्यात यावे. तसेच, यासंदर्भात सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : सीबीसी-१०/ २००८/ प्र.क्र.६९७/ विजाभज-१, दिनांक २४.६.२०१३ अन्वये विहित केलेली तरतूद विचारात घेण्यात यावी.

(१४) लघुटंकलेखकांची पदे ही मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व बृहन्मुंबईतील विविध कार्यालयातील असल्याचे प्रस्तुत परीक्षेच्या जाहिरातीत स्पष्ट करण्यात आले होते. त्यामुळे उमेदवारांची अन्य जिल्ह्यामध्ये नियुक्ती/बदली देण्याची विनंती मान्य केली जाणार नाही व या संदर्भातील अर्जाची दखल घेतली जाणार नाही.तसेच, अन्य विभाग/कार्यालयात पुनर्वाटप करण्याबाबतच्या विनंतीचाही विचार करण्यात येणार नाही. उमेदवारांनी सदर नियुक्ती विहीत मुदतीत स्विकारणे आवश्यक असून या संदर्भात उमेदवारांच्या मुदतवाढीच्या विनंती अर्जाची दखल घेतली जाणार नाही वा याबाबतच्या पत्रव्यवहाराची पोचही या विभागाकडून दिली जाणार नाही.

(१५) मुंबईबाहेरील उमेदवारांनी त्यांच्या मुंबईतील निवासस्थानाबाबतची व्यवस्था स्वत:च करावयाची असून त्यासाठी मुदतवाढ दिली जाणार नाही.

(१६) अस्थायी नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाण्याकरीता लागणारा प्रवास खर्च उमेदवाराने स्वत:च सोसावयाचा आहे.

(१७) उमेदवाराने नियुक्ती स्विकारल्यानंतर सोबत जोडलेला रुजू अहवाल या कार्यासनास तात्काळ सादर करावा.

(१८) नियुक्तीसाठी रुजू होणाऱ्या उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी व त्यासोबतचे प्रतिवेदन कोणत्याही परिस्थितीत नियुक्तीनंतर तात्काळ या विभागाकडे पाठविण्यात यावे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२८१६०८२९८३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: CN = Gajanan Bhimrao Gurav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = General Administration Department
Date: 2018.11.28 16:18:27 +05'30'

(ग. भि. गुरव)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
उमेदवारासाठी सहपत्रे :

१) रुजू अहवाल
२) नियतवाटप केलेल्या कार्यालयांच्या पत्त्यांची यादी

कार्यालयांसाठीसहपत्रे

१) उमेदवारांच्या नावांची यादी (उमेदवारांच्या भ्रमणध्वनी व ई मेल क्रमांकासह)
२) उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत
३) लघुटंकलेखक परीक्षा २०१८ साठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेल्या जाहिरातीची प्रत (अधिसूचना)
४) प्रतिवेदन नमुना (उमेदवार दि.२८.१२.२०१८ पर्यंत विभाग/कार्यालयात नियुक्तीसाठी हजर न झाल्यास त्या उमेदवाराच्या आवेदनपत्राच्या संगणकीय व ओळखपत्राच्या प्रतीसह कोणत्याही परिस्थितीत दि. ३१.१२.२०१८ पर्यंत या विभागास पाठविण्यात यावा)

प्रत -:

१) अवर सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, यांना उपरोक्त सहपत्रांसह.
२) नियुक्ती प्राधिकारी, संबंधित बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालय, यांना उपरोक्त सहपत्रांसह.
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, यांना उपरोक्त सहपत्रांसह.
४) सर्व संबंधित उमेदवार, यांना रुजू अहवालाचा नमुना प्रतीसह (ई मेल द्वारे).
५) संग्रहार्थ (कार्यासन १४-अ)

| सरळसेवा लघुटंकलेखक (मराठी) परीक्षा 2017 मधून मंत्रालयीन विभाग व बृहन्मुंबईतील राज्य शासकीय कार्यालयात करावयाचे नियतवाटप | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **शासन ज्ञापन क्र.एएससी-1518/प्र.क्र.157/14-अ, दिनांक 28 नोव्हेंबर, 2018 सोबतचे विवरणपत्र-अ** | | | | | | |
| लघुटंकलेखक मराठी नियतवाटप | | | | | | |
| **अ.क्र.** | **शिफारस क्रमांक** | **उमेदवाराचे नांव** | **व्यक्तीचा प्रवर्ग** | **शिफारस प्रवर्ग** | **नियतवाटप केलेला विभाग/कार्यालय** | |
| 1 | 1 | GAIKWAD NITA DEVIDAS | SC Female | SC-Female-1 | लोकायुक्त कार्यालय,मुंबई | |
| 2 | 2 | KINHEKAR KALYANI PRABHAKAR | OBC Female | OBC-General-1 | सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय | |
| 3 | 3 | KAMBLE JAYMALA VIJAY | SC Female | SC-General-1 | उद्योग संचालनालय,मुंबई | |
| 4 | 5 | WALUNJ PRITAM BHAGWAN | Open Female | OPEN-Female-1 | जिल्हाधिकारी मुंबई उपनगर,मुंबई | |
| 5 | 6 | MULLA NAZIYA APPASO | Open Female | OPEN-Female-2 | जलसंपदा विभाग,मंत्रालय | |
| 6 | 9 | GAGARE AADISHA SHANKAR | ST Female | ST-General-1 | महसूल व वन विभाग,मंत्रालय | |
| 7 | 10 | MARODE PAVAN PARMANAND | OBC | OPEN-General-1 | उद्योग संचालनालय,मुंबई | |
| 8 | 11 | MALWATKAR SHASHANK SHARADRAO | Open | OPEN-General-2 | माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई | |
| 9 | 14 | BANSOD ROSHAN RAJKUMAR | SC | SC-General-2 | कृषि व पदुम विभाग,मंत्रालय | |
| 10 | 15 | SHINDE SNEHA MOHANRAO | Open Female | OPEN-General-3 | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये,मंत्रालय | |
| 11 | 17 | NANKAR AJAY RAMCHANDRA | OBC | OPEN-General-4 | सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय | |

सरळसेवा लघुटंकलेखक (इंग्रजी) परीक्षा 2017 मधून मंत्रालयीन विभाग व बृहन्मुंबईतील राज्य शासकीय कार्यालयात करावयाचे नियतवाटप

**शासन ज्ञापन क्र.एएससी-1518/प्र.क्र.157/14-अ, दिनांक 28 नोव्हेंबर, 2018 सोबतचे विवरणपत्र-अ**

लघुटंकलेखक इंग्रजी नियतवाटप

| अ.क्र. | शिफारस क्रमांक | उमेदवाराचे नांव | व्यक्तीचा प्रवर्ग | शिफारस प्रवर्ग | नियतवाटप केलेला विभाग/कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 1 | YENGADE VIKAS NAGORAO | SC | SC-General-1 | नारायाण मेघाजी लोखंडे प्रतिष्ठान,मुंबई |
| 2 | 2 | MAHALE VAISHNAVI DEEPAK | Open Female | OPEN-Female-1 | ओद्योगिक व कामगार न्यायालय,मुंबई |
| 3 | 3 | JADHAV CHANCHAL RAMNATH | NT(B) Female | NT-B-General-1 | विक्रीकर आयुक्त कार्यालय,माझगांव,मुंबई |
| 4 | 4 | BACHATE SHRIKRUSHNA BALASAHEB | Open | Against OPEN-Ex Ser-1 | कामगार आयुक्त कार्यालय,मुंबई |
| 5 | 5 | SINGH SHUBHAM VIRENDRA | Open | Against OPEN-Ex Ser-2 | उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय |
| 6 | 7 | AHER SACHIN ABASAHEB | Open | OPEN-General-1 | सरकारी वकील(अपिल शाखा),मुंबई |
| 7 | 8 | SINALKAR VAISHALI POPAT | OBC Female | OPEN-General-2 | सरकारी वकील (मूळ शाखा),मुंबई |
| 8 | 9 | SHIRSEKAR RUCHITA RAVINDRA | Open | OPEN-General-3 | सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय |
| 9 | 10 | GALAPURE POOJA TUSHAR | OBC Female | OPEN-General-4 | विधि व न्याय विभाग,मंत्रालय |
| 10 | 11 | DHUMAL SARIKA SURYAKANT | Open Female | OPEN-Female-2 | वित्त विभाग,मंत्रालय |
| 11 | 12 | KUMBHAR VAISHNAVI DILEEP | OBC Female | OBC-General-1 | विक्रीकर आयुक्त कार्यालय,माझगांव,मुंबई |
| 12 | 14 | KADAM PRANALI RATNDEEP | Open Female | OPEN-Female-3 | सरकारी वकील(अपिल शाखा),मुंबई |

उमेदवाराचा रूजू अहवाल

## नियुक्ती दिलेल्या उमेदवाराने त्यास नियुक्ती दिलेल्या कार्यालयात रूजू झाल्याबाबतचा अहवाल

दिनांक-

उमेदवाराचे नाव व भ्रमणध्वनी क्रमांक -
उमेदवाराची जन्म तारीख-
उमेदवाराची शैक्षणिक अर्हता-
उमेदवाराचा गुणवत्ता क्रमांक-
उमेदवाराचा स्वतःचा मूळ प्रवर्ग-

प्रति,
**अवर सचिव (कार्यासन १४अ)**
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४००० ३२

महोदय,

मी खाली सही करणार श्री/ श्रीमती/कु. -------------------------------------------- - नमूद करतो / करते की , आपले पत्र क्रमांक एएससी १५१८/ प्र.क्र. १५७ /२०१८/१४ अ ,दिनांक २८.११.२०१८ रोजीचे पत्र मला मिळाले. त्यानुसार मी ------------------------------------------------ या कार्यालयात लघुटंकलेखक ( इंग्रजी/मराठी) या पदावर दिनांक ----------------- रोजी रूजू झालो / झाले. हे आपणांस माहितीसाठी व उचित कार्यवाहीसाठी कळविण्यात येत आहे.

**उमेदवारास नियुक्ती दिलेल्या कार्यालयाचा पत्ता*** (खालील तळटीप पहावी)

आपला/ आपली,

( )
**उमेदवाराची सही व नाव**

* तळटीप :- उमेदवाराने नियुक्ती दिलेल्या विभाग / कार्यालयात रूजू झाल्यानंतर वरील पत्र तात्काळ या विभागास सादर करावे अन्यथा त्यांना दिलेली नियुक्ती त्यांनी स्विकारली नाही असे समजून योग्य ती पुढील कार्यवाही केली जाईल याची त्यांनी नोंद घ्यावी.

| अ.क्र. | मंत्रालयीन विभागांची यादी (लघुटंकलेखक मराठी/इंग्रजी) |
|---|---|
| १ | अवर सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, ४ था मजला, मंत्रालय, मुख्य इमारत , मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. |
| २ | अवर सचिव (आस्थापना), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, शासकीय इमारत, ९ वा मजला, क्रॉफर्ड मार्केट समोर, मुंबई ४०० ००१. |
| ३ | अवर सचिव (आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, दालन क्र.३१७ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६४२ |
| ४ | अवर सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, दालन क्र.५२२ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६९०/२२७९३५२० |
| ५ | अवर सचिव (आस्थापना), सार्वजनिक बांधकाम विभाग, दालन क्र.२६० ( विस्तार ), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३८४७ |
| ६ | अवर सचिव (आस्थापना), महसूल व वन विभाग, पहिला मजला, मंत्रालय, मुख्य इमारत, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र. |
| ७ | अवर सचिव (आस्थापना), विधी व न्याय विभाग, पाचवा मजला, मंत्रालय, मुख्य इमारत, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३६१० |
| ८ | अवर सचिव (आस्थापना), सार्वजनिक आरोग्य विभाग विभाग, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, १० वा मजला, क्रॉफर्ड मार्केट समोर, मुंबई ४०० ००१. २२६१७५१०, -७६४७, -७५१४, -७३९४ EXT- २१९, US २१२ |
| ९ | अवर सचिव (आस्थापना), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दालन क्र.१२० (विस्तार), पहिला मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२७९३७२१ |
| १० | अवर सचिव (आस्थापना), वित्त विभाग, दालन क्र.३१९ (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२. दुरध्वनी क्र.२२८२६८११ |

बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालये (लघुटंकलेखक)

| | |
|---|---|
| १ | उद्योग उपसंचालक(आस्थापना),<br>उद्योग संचालनालय, नविन प्रशासन भवन,<br>मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२ |
| २ | जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा यांचे<br>कार्यालय, प्रशासकीय इमारत, १० वा मजला, सरकारी वसाहत,<br>वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१ |
| ३ | सहायक संचालक(आस्थापना),<br>माहिती व जनसंपर्क संचालनालय, नवीन प्रशासन भवन,<br>१७ वा मजला,मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२. |
| ४ | लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, नवीन<br>प्रशासन भवन, पहिला मजला, मादाम कामा रोड ०७, मंत्रालयासमोर, मुंबई ३२ |
| ५ | प्रभारी प्रबंधक , औद्योगिक न्यायालय, महाराष्ट्र, मुंबई,<br>प्रशासकीय इमारत, पहिला मजला, शासकीय वसाहत, वांद्रे (पूर्व),मुंबई - ४०० ०५१. |
| ६ | कामगार आयुक्त,कामगार आयुक्त यांचे कार्यालय,<br>कामगार भवन, ई ब्लॉक , सी-२०, बांद्रा-कुर्ला संकूल,<br>बांद्रा (पूर्व), मुंबई-५१ |
| ७ | संचालक, कै नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, दादाभाई<br>सुमारबागवाला मार्ग , परेल, मुबंई ४०००१२ |
| ८ | विशेष विक्रीकर आयुक्त, विशेष विक्रीकर आयुक्तांचे कार्यालय,<br>विक्रीकर भवन, ३ रा मजला, "एच" विंग, बलवंतसिंग दोधी मार्ग, महाराणा प्रताप<br>चौक, माझगांव, मुंबई-४०० ०१०. |
| ९ | आस्थापना अधिकारी,सरकारी वकीलांचे कार्यालय,<br>उच्च न्यायालय (मूळ शाखा),मुंबई ४०० ०३२ |
| १० | आस्थापना अधिकारी,सरकारी वकीलांचे कार्यालय,<br>अपील शाखा , उच्च न्यायालय, मुंबई ४०० ०३२ |




महाराष्ट्र लोकसेवा आयोग
Maharashtra Public Service Commission

मुख्य कार्यालय : ५[१/२], ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०००२१ दूरध्वनी - २२७९५९०० फॅक्स : २२८८०५२४
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा मजला, फोर्ट, मुंबई ४००००१ दूरध्वनी २२६७०२१०/९९८/४७८,२२१०२२२२, फॅक्स : २२६७३११५

ई-मेल – sec.mpsc@maharashtra.gov.in वेबसाईट - www.mpsc.gov.in, https://mahampsc.mahaonline.gov.in

# लघुटंकलेखक (मराठी) गट - क

## सामान्य प्रशासन विभाग

**धारिका क्रमांक : ११(४)/६९०२/पंधरा**

जाहिरात क्रमांक :०९/२०१८

आयोगामार्फत **महाराष्ट्र शासनाच्या सामान्य प्रशासन विभागांतर्गत** लघुटंकलेखक (मराठी) गट - क **या पदाच्या ११ जागांसाठी ऑनलाईन** पध्दतीने **अर्ज** मागविण्यात येत आहेत. या पदासाठी खालील अटी व अर्हतांची पूर्तता करणारे उमेदवार अर्ज करु शकतात.

**२ . उपलब्ध पदसंख्या :- ११**

**अ) मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील लघुटंकलेखक (मराठी) - ६ पदे**

| जात प्रवर्ग | अ.जा | अ.ज | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | वि.मा.प्र. | इ.मा.व | एकूण मागासवर्गीय | अमागास | एकूण पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १ | १ | -- | -- | -- | -- | -- | १ | ३ | ३ | ६ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे. | | | | | | | | | | | |
| **सर्वसाधारण** | १ | १ | -- | -- | -- | -- | -- | १ | ३ | २ | ५ |
| **अ)महिला (३०%)** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १* | १* |
| **ब)खेळाडू(५%)** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |
| (* उपलब्ध असल्यास महिलांसाठी आरक्षित) | | | | | | | | | | | |

**ब) बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लघुटंकलेखक (मराठी) - ५ पदे**

| जात प्रवर्ग | अ.जा | अ.ज | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | वि.मा.प्र. | इ.मा.व | एकूण मागासवर्गीय | अमागास | एकूण पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | २ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | २ | ३ | ५ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे. | | | | | | | | | | | |
| **सर्वसाधारण** | १ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १ | २ | ३ |
| **अ)महिला (३०%)** | १* | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १* | १* | २* |
| **ब)खेळाडू(५%)** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |
| (* उपलब्ध असल्यास महिलांसाठी आरक्षित) | | | | | | | | | | | |

**२.१** वर नमूद केलेल्या पदसंख्येत व आरक्षणामध्ये शासनाच्या संबंधित विभागाच्या सूचनेनुसार बदल होण्याची शक्यता आहे.

**२.२** सामान्य प्रशासन विभागाने कळविल्यानुसार मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट याचिका क्र. २०५३/२०१४ श्री संजिव शुक्ला विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर संलग्न याचिका प्रकरणी होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून मागासवर्गीयांच्या आरक्षित पदांना मान्यता देण्यात आली आहे.

**२.३** सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. कअस - २३१५/ प्र.क्र.२२०/२४ - ब, दिनांक १६ एप्रिल, २०१६ च्या अनुषंगाने (अ) अंधत्व/क्षीणदृष्टी (Blindness/Low Vision) ब) चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदुचा अर्धांगवायू (locomotor disability or cerebral palsy) प्रकारचे विकलांग असलेले उमेदवार प्रस्तुत पदासाठी अर्ज करण्यासाठी पात्र आहेत. तथापि विकलांग उमेदवारांसाठी पद आरक्षित नाही.

**२.४** महिला आरक्षण व त्या संदर्भातील नॉन क्रिमीलेयर (NCL) तसेच मागासवर्गीय आरक्षण व त्या संदर्भातील नॉन क्रिमीलेयर (NCL) प्रमाणपत्राचा नमुना आणि इतर अटी व शर्तींबाबत उमेदवारांनी आयोगाच्या संकेतस्थळावरील "सरळसेवा भरती " विभागातील "उमेदवारांना सर्वसाधारण सूचना" काळजीपुर्वक अवलोकन करुनच त्याचे अनुपालन करावे.

**टीप – मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील व बृहन्मुंबई शासकीय कार्यालयातील सर्व पदांसाठी एकत्रित**

**शिफारस यादीद्वारे शासनास उमेदवारांच्या शिफारशी करण्यात येतील.**

**३. वेतनश्रेणी : पे बॅण्ड** रु. ५२००-२०२००/-, ग्रेड पे रु. २४००/- अधिक इतर भत्ते .

**४. पात्रता विषयक अटी**

४.१ उमेदवार भारतीय नागरीक असावा.

४.२ उमेदवार महाराष्ट्र राज्याचा अधिवासी असणे आवश्यक आहे.

**४.३ वय — १)** दिनांक १ मे, २०१८ रोजी १८ वर्षे पुर्ण असावे, तसेच अमागास उमेदवारांकरीता ३८ वर्षापेक्षा व मागासवर्गीयांसाठी ४३ वर्षांपेक्षा जास्त नसावे .

४.४ शासन सेवेत पुर्णवेळ कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षापर्यंत शिथिल करण्यात येईल. तथापि शासनसेवेतील मागासवर्गीय उमेदवारांना वयोमर्यादेतील सवलती ऐवजी, शासन कर्मचारी म्हणून ५ वर्षाची एकच सवलत उपलब्ध राहील.

**४.५ शैक्षणिक अर्हता —** अ) माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण.

ब) मराठी लघुलेखनाची गती ८० शब्द प्रति मिनिट व मराठी टंकलेखनाची गती ३० शब्द प्रति मिनिट (तत्संबंधी, शासकीय परीक्षा मंडळाचे प्रमाणपत्र आवश्यक)

**४.६** संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान आवश्यक. (महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांची MS-CIT परीक्षा किंवा D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत "C.C.C." किंवा "O" किंवा "A" किंवा "B" किंवा "C" स्तर परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक.)

**५.** प्रस्तुत पदासाठी खालील तीन टप्प्यांमध्ये सदर भरती प्रक्रिया घेण्यात येणार आहे.

१) वस्तुनिष्ठ स्वरुपाची चाळणी परीक्षा - १०० गुण

२) लघुलेखन-टंकलेखन चाचणी - ७५ गुण

३) मुलाखत - २५ गुण

**५.१** चाळणी परीक्षा केवळ मुलाखतीसाठी उमेदवारांची संख्या मर्यादित करण्यासाठी घेण्यात येत असल्यामुळे त्या परीक्षेचे गुण अंतिम निकालासाठी विचारात घेतले जाणार नाहीत. चाळणी परीक्षा घेण्यात येणार असल्यामुळे जाहिरातीतील विहित मूळ अर्हता शिथिल केली जाणार नाही. सदर परीक्षेची तारीख यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल. सदर परीक्षेचा अभ्यासक्रम, परीक्षा योजना, परीक्षेचे माध्यम व इतर बाबी आयोगाच्या वेब साईटवर पहाव्यात.

**५.२** मुलाखतीसाठी बोलविलेल्या उमेदवारांची मुलाखतीपूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात वा अन्यत्र लघुलेखनाची-टंकलेखनाची प्रत्यक्ष चाचणी घेण्यात येईल. उमेदवारांनी लघुलेखन घेतल्यावर त्यांना ते संगणकावर टंकलिखीत करुन द्यावे लागेल. लघुलेखन-टंकलेखन चाचणी ७५ गुणांची राहील. मुलाखतीस पात्र ठरण्यासाठी उमेदवारांना लघुलेखन-टंकलेखन चाचणीमध्ये किमान ३१ गुण प्राप्त करणे आवश्यक आहे. ३१ गुणांपेक्षा कमी गुण प्राप्त झालेल्या उमेदवारांची मुलाखत घेतली जाणार नाही.

**५.३** लघुलेखन-टंकलेखन चाचणीत पात्र ठरलेल्या उमेदवारांची २५ गुणांची मुलाखत घेण्यात येईल. मुलाखतीपूर्वी घेण्यात येणा-या लघुलेखन-टंकलेखन चाचणीचे ७५ गुण व मुलाखतीचे २५ गुण अशा एकूण १०० गुणांपैकी किमान ४१ गुण प्राप्त करणा-या उमेदवारांचाच फक्त शिफारशीसाठी विचार करण्यात येईल.

**५.४** लघुलेखन-टंकलेखन चाचणीचे व मुलाखतीचे गुण अशा एकूण १०० गुणांपैकी प्राप्त गुणांच्या आधारे प्रस्तुत पदाची गुणवत्ता यादी तयार करण्यात येईल व त्याआधारे निवडीच्या उपलब्ध पदे व गुणवत्ता या आधारे उमेदवारांची शासनास शिफारस करण्यात येईल.

**६. जे उमेदवार चुकीची माहिती सादर करतील त्यांना या व पुढील सर्व निवडीसाठी अपात्र ठरविण्यात येईल.**

७. कर्तव्ये व जबाबदाऱ्या - प्रस्तुत पदाच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या याबाबतचा तपशील आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

८. शुल्क : -

८.१. अमागास उमेदवारांकरिता - रु. ३७४/-, मागासवर्गीय उमेदवारांकरिता - रु. २७४/-

८.२ ज्या मागासवर्गीय उमेदवारांनी वयोमर्यादा किंवा पात्रतेच्या कोणत्याही निकषांमध्ये सवलत किंवा सूट याचा फायदा घेतला आहे, अशा उमेदवारांची अमागास सर्वसाधारण वर्गवारीच्या पदावर शिफारस करण्यात येणार नाही.

९. अर्ज करण्याची पध्दत —

९.१ प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील. इतर कोणत्याही प्रकारे अर्ज स्वीकारण्यात येणार नाहीत.

९.२ पात्र उमेदवारांना वेब-बेस्ड (Web-based) ऑन लाईन अर्ज https://.mahampsc.mahaonline.gov.in या वेबसाईटद्वारे **दिनांक २५ जानेवारी, २०१८ ते दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८** या कालावधीत सादर करणे आवश्यक राहील.

९.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://.mahampsc.mahaonline.gov.in तसेच www. mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

९.४ विहित पद्धतीने आयोगास अर्ज सादर केल्यानंतर परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

९.५ आयोगाने निश्चित केलेले परीक्षा शुल्क खालील पद्धतीने भरता येईल :-

(१) भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे (२) नेटबँकिंग (३) डेबीट कार्ड (४)क्रेडिट कार्ड (५) संग्राम केंद्र/ सीएफसी (नागरीक सुविधा केंद्र)

९.६ https://.mahampsc.mahaonline.gov.in येथे संग्राम केंद्र (ग्रामपंचायतींमध्ये) आणि सीएफसी ची सूची उपलब्ध आहे.

९.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

(१) शुल्क भरण्याकरिता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील " माझे खाते " या लिंक वर क्लिक करावे.

(२) "माझे खाते" या लिंक वर क्लिक केल्यानंतर उमेदवाराने अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या / न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. ज्या पदासमोर ' **Unpaid** ' असे लिहिलेले असेल, त्या ठिकाणी '**Pay Now**' अशी लिंक उपलब्ध असेल.

(३) "**Pay Now**" या लिंक वर क्लिक केल्यानंतर 3 पर्याय उपलब्ध होतील.

(१) ऑनलाईन पेमेंट (२) नागरी सुविधा केंद्र (३)चलनाद्वारे

(४) उमेदवार क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन पेमेंट करु शकतील.

(५) नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. उपरोक्त कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

(६) उमेदवाराने चलनाद्वारे हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

(७) ज्या उमेदवारांना भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरावयाचे आहे असे उमेदवार अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर करणा-या उमेदवारांनी त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

१०. चाळणी परीक्षेचे प्रवेश प्रमाणपत्र सदर परीक्षेच्या अर्ज स्विकारण्याच्या अंतिम दिनांकानंतर व परीक्षेपूर्वी ७ दिवस अगोदर उमेदवारास त्याच्या प्रोफाईलव्दारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत उमेदवाराने चाळणी परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व चाळणी परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

११. चाळणी परीक्षेच्या वेळी उमेदवाराने प्रवेश प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय चाळणी परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१२. समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-३ १०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ दिनांक १३ ऑगस्ट २०१४ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.**

**१३. मुलाखतीसाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना, मुलाखतीचे वेळी सर्व मुळ प्रमाणपत्रे सादर करणे बंधनकारक आहे. सदर मूळ प्रमाणपत्रे मुलाखतीच्या वेळी सादर न केल्यास अथवा ती योग्य नसल्यास मुलाखत घेण्याचे नाकारले जाईल याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.**

**१४. आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक किंवा संपर्क साधने आणण्यास,बाळगण्यास वा वापरण्यास सक्त मनाई आहे.**

१५. विहित पध्दतीने अर्ज सादर करुन ऑनलाईन शुल्क भरण्याची, तसेच स्टेट बँकेमध्ये परीक्षा शुल्क भरण्याकरिता चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८ रोजी २३.५९ वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

१६. चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८ पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.

**ठिकाण :- मुंबई**
**दिनांक :- २५/०१/२०१८**

**राजन बा. खोत**
**उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग**






महाराष्ट्र लोकसेवा आयोग

**Maharashtra Public Service Commission**

मुख्य कार्यालय : ५½, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०००२१ दूरध्वनी - २२७९५९०० फॅक्स : २२८८०५२४

फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा माळा, फोर्ट, मुंबई ४००००१ दूरध्वनी :२२६७०२१०/१४८/२४८,२२१०२२२२, फॅक्स : २२६७३११५

ई-मेल – sec.mpsc@maharashtra.gov.in वेबसाईट - www.mpsc.gov.in, https://mahampsc.mahaonline.gov.in


# लघुटंकलेखक (इंग्रजी), गट - क

## सामान्य प्रशासन विभाग

**धारिका क्रमांक : ११(४)/६९०२(A)/पंधरा**

जाहिरात क्रमांक : १०/२०१८

आयोगामार्फत **महाराष्ट्र शासनाच्या सामान्य प्रशासन विभागांतर्गत** लघुटंकलेखक (इंग्रजी ) गट - **क या पदाच्या १२ जागांसाठी ऑनलाईन** पध्दतीने **अर्ज** मागविण्यात येत आहेत. या पदासाठी खालील अटी व अर्हतांची पूर्तता करणारे उमेदवार अर्ज करु शकतात.

**२ . उपलब्ध पदसंख्या :- १२**

**अ) मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील लघुटंकलेखक (इंग्रजी) - ४ पदे**

| जात प्रवर्ग | अ.जा | अ.ज | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | वि.मा.प्र. | इ.मा.व | एकूण मागासवर्गीय | अमागास | एकूण पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | ४ | ४ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे. | | | | | | | | | | | |
| **सर्वसाधारण** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | २ | २ |
| **अ)महिला (३०%)** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १* | १* |
| **ब)खेळाडू(५%)** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |
| **क) माजी सैनिक १५%** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १# | १# |
| (* उपलब्ध असल्यास महिलांसाठी आरक्षित, # उपलब्ध असल्यास माजी सैनिकांसाठी आरक्षित) | | | | | | | | | | | |

**ब) बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लघुटंकलेखक (इंग्रजी) - ८ पदे**

| जात प्रवर्ग | अ.जा | अ.ज | वि.जा. (अ) | भ.ज. (ब) | भ.ज. (क) | भ.ज. (ड) | वि.मा.प्र. | इ.मा.व | एकूण मागासवर्गीय | अमागास | एकूण पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १ | -- | -- | १ | -- | -- | -- | १ | ३ | ५ | ८ |
| रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे. | | | | | | | | | | | |
| **सर्वसाधारण** | १ | -- | -- | १ | -- | -- | -- | १ | ३ | २ | ५ |
| **अ)महिला (३०%)** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | २* | २* |
| **ब)खेळाडू(५%)** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- |
| **क) माजी सैनिक १५%** | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | १# | १# |
| (* उपलब्ध असल्यास महिलांसाठी आरक्षित, # उपलब्ध असल्यास माजी सैनिकांसाठी आरक्षित) | | | | | | | | | | | |

**२.१** वर नमूद केलेल्या पदसंख्येत व आरक्षणामध्ये शासनाच्या संबंधित विभागाच्या सूचनेनुसार बदल होण्याची शक्यता आहे.

**२.२** सामान्य प्रशासन विभागाने कळविल्यानुसार मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट याचिका क्र. २०५३/२०१४ श्री संजिव शुक्ला विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर संलग्न याचिका प्रकरणी होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून मागासवर्गीयांच्या आरक्षित पदांना मान्यता देण्यात आली आहे.

**२.३** सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. कअस - १३१५/ प्र.क्र.१२०/१४ - ब, दिनांक १६ एप्रिल, २०१६ च्या अनुषंगाने (अ) अंधत्व/क्षीणदृष्टी (Blindness/Low Vision)ब) चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदुचा अर्धांगवायू (locomotor disability or cerebral palsy) प्रवर्गाचे विकलांग असलेले उमेदवार प्रस्तुत पदासाठी अर्ज करण्यासाठी पात्र आहेत. तथापि विकलांग वर्गवारीसाठी पद आरक्षित नाही.

२.४ शासन आदेशानुसार भ.ज.(ब) वर्गवारीसाठी आरक्षित असलेले पद आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदावर योग्य उमेदवार उपलब्ध न झाल्यास शासनाच्या अंतर्गत परिवर्तनीयतेच्या धोरणानुसार सदर पदासाठी वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज. (ड) या पैकी उपलब्ध वर्गवारीच्या उमेदवाराचा गुणवत्तेच्या आधारावर विचार करण्यात येईल.

२.५ महिला आरक्षण व त्या संदर्भातील नॉन क्रिमीलेयर (NCL) तसेच मागासवर्गीय आरक्षण व त्या संदर्भातील नॉन क्रिमीलेयर (NCL) प्रमाणपत्राचा नमुना आणि इतर अटी व शर्तीबाबत उमेदवारांनी आयोगाच्या संकेतस्थळावरील "सरळसेवा भरती " विभागातील "उमेदवारांना सर्वसाधारण सुचनांचे" काळजीपुर्वक अवलोकन करुनच त्याचे अनुपालन करावे.

**टीप — मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील व बृहन्मुंबई शासकीय कार्यालयातील सर्व पदांसाठी एकत्रित शिफारस यादीद्वारे शासनास उमेदवारांच्या शिफारशी करण्यात येतील.**

**३. वेतनश्रेणी : पे बॅण्ड** रु. ५२००-२०२००/-, ग्रेड पे रु. २४००/-अधिक इतर भत्ते .

**४. पात्रता विषयक अटी**

४.१ उमेदवार भारतीय नागरीक असावा.

४.२ उमेदवार महाराष्ट्र राज्याचा अधिवासी असणे आवश्यक आहे.

**४.३ वय — दिनांक** १ मे, २०१८ रोजी १८ वर्षे पुर्ण असावे, तसेच अमागास उमेदवारांकरीता ३८ वर्षापेक्षा व मागासवर्गीयांसाठी ४३ वर्षापेक्षा जास्त नसावे.

४.४ शासन सेवेत पुर्णवेळ कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षापर्यंत शिथिल करण्यात येईल. तथापि शासनसेवेतील मागासवर्गीय उमेदवारांचे वयोमर्यादेतील सवलती ऐवजी, शासन कर्मचारी म्हणून ५ वर्षाची एकच सवलत उपलब्ध राहील.

**४.५ अर्हता —** अ) माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण.
ब) इंग्रजी लघुलेखनाची गती ८० शब्द प्रति मिनिट व इंग्रजी टंकलेखनाची गती ४० शब्द प्रति मिनिट (तत्संबंधी शासकीय परीक्षा मंडळाचे प्रमाणपत्र आवश्यक)

४.६ संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान आवश्यक. (महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांची MS-CIT परीक्षा किंवा D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत "C.C.C." किंवा "O" किंवा "A" किंवा "B" किंवा "C" स्तर परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक.)

४.७ मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लघुटंकलेखक (इंग्रजी) या पदावर नियुक्ती होणा-या उमेदवारांना म.ना.से. (इंग्रजी लघुलेखक व इंग्रजी टंकलेखक यांना प्राप्त करावयाच्या मराठी लघुलेखक/मराठी टंकलेखन परीक्षा सक्तीची करण्याबाबत) नियमावली १९९१ मधील नियम ३ व ४ नुसार, एतदर्थ मंडळाची मराठी लघुलेखनाची ८० शब्द प्रति मिनिट व मराठी टंकलेखनाची ३० शब्द प्रति मिनिट परीक्षा, शासन सेवेत प्रविष्ठ झाल्याच्या दिनांकापासून ४ वर्षाच्या आत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तथापि, शासन अधिसूचना क्र. टंलेप २०१५/प्र.क्र.१७६/भाषा २, दिनांक २४/०३/२००७ मधील तरतुदीनुसार, ज्या इंग्रजी लघुलेखकांनी मूळ नियुक्तीच्या वेळी किंवा यथास्थिती, शासकीय सेवेत रुजू झाल्याच्या दिनांकापासून ४ वर्षाच्या कालावधीत मराठी लघुलेखनाचे ८० शब्द प्रति मिनिट व मराठी टंकलेखनाचे ३० शब्द प्रति मिनिट गतीचे अथवा अधिक गतीचे मराठी लघुलेखन व मराठी टंकलेखनाचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र धारण केले आहे अशा इंग्रजी लघुलेखकांना एतदर्थ मंडळाची ८० शब्द प्रति मिनिट मराठी लघुलेखनाची व ३० शब्द प्रति मिनिट मराठी टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येईल.

५. प्रस्तूत पदासाठी खालील तीन टप्प्यांमध्ये सदर भरती प्रक्रिया घेण्यात येणार आहे.

१) वस्तुनिष्ठ स्वरुपाची चाळणी परीक्षा - १०० गुण

२) लघुलेखन-टंकलेखन चाचणी - ७५ गुण

३) मुलाखत - २५ गुण

५.१ चाळणी परीक्षा केवळ मुलाखतीसाठी उमेदवारांची संख्या मर्यादित करण्यासाठी घेण्यात येत असल्यामुळे त्या परीक्षेचे गुण अंतिम निकालासाठी विचारात घेण्यात येणार नाहीत. चाळणी परीक्षा घेण्यात येणार असल्यामुळे जाहिरातीतील विहित मूळ अर्हता शिथिल केली जाणार नाही. सदर परीक्षेची तारीख यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल. सदर परीक्षेचा अभ्यासक्रम, परीक्षा योजना, परीक्षेचे माध्यम व इतर बाबी आयोगाच्या वेब साईटवर पहाव्यात.

५.२ मुलाखतीसाठी बोलविलेल्या उमेदवारांची मुलाखतीपूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात वा अन्यत्र लघुलेखनाची-टंकलेखनाची प्रत्यक्ष चाचणी घेण्यात येईल. उमेदवारांनी लघुलेखन घेतल्यावर त्यांना ते संगणकावर टंकलिखीत करुन द्यावे लागेल. लघुलेखन-टंकलेखन चाचणी ७५ गुणांची राहील. मुलाखतीस पात्र ठरण्यासाठी उमेदवारांना लघुलेखन-टंकलेखन चाचणीमध्ये किमान ३१ गुण प्राप्त करणे आवश्यक आहे. ३१ गुणांपेक्षा कमी गुण प्राप्त झालेल्या उमेदवारांची मुलाखत घेतली जाणार नाही.

५.३ लघुलेखन-टंकलेखन चाचणीत पात्र ठरलेल्या उमेदवारांची २५ गुणांची मुलाखत घेण्यात येईल. मुलाखतीपूर्वी घेण्यात येणा-या लघुलेखन-टंकलेखन चाचणीचे ७५ गुण व मुलाखतीचे २५ गुण अशा एकूण १०० गुणांपैकी किमान ४१ गुण प्राप्त करणा-या उमेदवारांचाच फक्त शिफारशीसाठी विचार करण्यात येईल.

५.४ लघुलेखन-टंकलेखन चाचणीचे व मुलाखतीचे गुण अशा एकुण १०० गुणांपैकी प्राप्त गुणांच्या आधारे प्रस्तुत पदाची गुणवत्ता यादी तयार करण्यात येईल व वर्गवारी निहाय उपलब्ध पदे व गुणवत्ता या आधारे उमेदवारांची शासनास शिफारस करण्यात येईल.

**६. जे उमेदवार चुकीची माहिती सादर करतील त्यांना या व पुढील सर्व निवडीसाठी अपात्र ठरविण्यात येईल.**

७. कर्तव्ये व जबाबदाऱ्या - प्रस्तुत पदाच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या याबाबतचा तपशील आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

**८. शुल्क : -**

८.१. अमागास उमेदवारांकरिता - रु. ३७४/-, मागासवर्गीय उमेदवारांकरिता - रु. २७४/-

८.२ ज्या मागासवर्गीय उमेदवारांनी वयोमर्यादा किंवा पात्रतेच्या कोणत्याही निकषांमध्ये सवलत किंवा सूट याचा फायदा घेतला आहे, अशा उमेदवारांची अमागास सर्वसाधारण वर्गवारीच्या पदावर शिफारस करण्यात येणार नाही.

९. अर्ज करण्याची पध्दत —

९.१ प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील. इतर कोणत्याही प्रकारे अर्ज स्वीकारण्यात येणार नाहीत.

९.२ पात्र उमेदवारांना वेब-बेस्ड (Web-based) ऑन लाईन अर्ज https://.mahampsc.mahaonline.gov.in या वेबसाईटद्वारे दिनांक २५ जानेवारी, २०१८ ते दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत सादर करणे आवश्यक राहील.

९.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://.mahampsc.mahaonline.gov.in तसेच www. mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

९.४ विहित पद्धतीने आयोगास अर्ज सादर केल्यानंतर परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

९.५ आयोगाने निश्चित केलेले परीक्षा शुल्क खालील पद्धतीने भरता येईल :-

(१) भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे (२) नेटबँकिंग (३) डेबीट कार्ड (४) क्रेडिट कार्ड (५) संग्राम केंद्र/ सीएफसी (नागरीक सुविधा केंद्र)

९.६ https://.mahampsc.mahaonline.gov.in येथे संग्राम केंद्र (ग्रामपंचायतींमध्ये) आणि सीएफसी ची सूची उपलब्ध आहे.

९.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

(१) शुल्क भरण्याकरिता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील " माझे खाते " या लिंक वर क्लिक करावे.

(२) "माझे खाते " या लिंक वर क्लिक केल्यानंतर उमेदवाराने अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या / न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. ज्या पदासमोर ' Unpaid ' असे लिहिलेले असेल, त्या ठिकाणी 'Pay Now' अशी लिंक उपलब्ध असेल.

(३) "Pay Now" या लिंक वर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील.

(१) ऑनलाईन पेमेंट (२) नागरी सुविधा केंद्र (३)चलनाद्वारे

(४) उमेदवार क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन पेमेंट करु शकतील.

(५) नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. उपरोक्त कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

(६) उमेदवाराने चलनाद्वारे हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

(७) ज्या उमेदवारांना भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरावयाचे आहे असे उमेदवार अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर करणा-या उमेदवारांनी त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

१०. चाळणी परीक्षेचे प्रवेश प्रमाणपत्र सदर परीक्षेच्या अर्ज स्विकारण्याच्या अंतिम दिनांका नंतर व परीक्षेपूर्वी ७ दिवस अगोदर उमेदवारास त्याच्या प्रोफाईलव्दारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत उमेदवाराने चाळणी परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व चाळणी परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

११. चाळणी परीक्षेच्या वेळी उमेदवाराने प्रवेश प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय चाळणी परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१२. समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही- ३ १०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ दिनांक १३ ऑगस्ट २०१४ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.**

**१३. मुलाखतीसाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना, मुलाखतीचे वेळी सर्व मुळ प्रमाणपत्रे सादर करणे बंधनकारक आहे. सदर मूळ प्रमाणपत्रे मुलाखतीच्या वेळी सादर न केल्यास अथवा ती योग्य नसल्यास मुलाखत घेण्याचे नाकारले जाईल याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.**

**१४. आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक किंवा संपर्क साधने आणण्यास, बाळगण्यास वा वापरण्यास सक्त मनाई आहे.**

**१५. विहित पध्दतीने अर्ज सादर करुन ऑनलाईन शुल्क भरण्याची, तसेच स्टेट बँकेमध्ये परीक्षा शुल्क भरण्याकरिता चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८ रोजी २३.५९ वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.**

**१६. चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८ पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.**

**ठिकाण :- मुंबई**
**दिनांक :- २५/०१/२०१८**

**राजन बा. खोत**
**उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग**

**लघुटंकलेखक (इंग्रजी/मराठी) या पदावर नियतवाटप केलेल्या उमेदवारांसंबंधी मंत्रालयीन प्रशासकीय विभागाचे आस्थापना अधिकारी व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयाचे नियुक्ती प्राधिकारी यांनी द्यावयाचे प्रतिवेदन**

क्रमांक: ( विभाग / कार्यालयाचे नांव व पत्ता)

दिनांक-

प्रति,

**अवर सचिव ( कार्यासन १४ अ )**
**सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय ,**
**मादाम कामा मार्ग , हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४००० ३२**

विषय: **लघुटंकलेखक परीक्षा -२०१८**
महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांची
लघुटंकलेखक (इंग्रजी/मराठी) पदावर नियुक्ती

संदर्भ:-पत्र क्रमांक: एएससी -१५१८/प्र.क्र.१५७/१८/१४-अ,दिनांक २८ नोव्हेंबर, २०१८

संदर्भाधीन पत्रान्वये लघुटंकलेखक ( **इंग्रजी/मराठी** ) या पदावर नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या उमेदवारांचे प्रतिवेदन पुढील प्रमाणे आहे:-

**(अ) नियुक्ती स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | रूजू झाल्याचा दिनांक |
|---|---|---|
| | | |
| | | |

**(ब) नियुक्ती न स्विकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव |
|---|---|
| | |

वरील (अ) येथे दर्शविलेल्या उमेदवारांनी योग्य ती प्रमाणपत्रे सादर केली असून ते लघुटंकलेखक (इंग्रजी/मराठी) पदावरील नियुक्तीसाठी आवश्यक त्या सर्व बाबी पूर्ण करीत त्यांच्या नेमणूकीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्यांच्या प्रती सोबत जोडण्यात आलेल्या आहेत. तसेच विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारणा-या (ब) येथे दर्शविलेल्या उमेदवाराची मूळ आवेदनपत्र या सोबत परत पाठविण्यात येत आहेत.

सहपत्र -:वरीलप्रमाणे **( नियुक्ती प्राधिका-यांची सही व पदनाम)**